२०१०१०२७१८०००५००१

**महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम,१९६६ राज्यातील सर्व महानगरपालिकांच्या विकास नियंत्रण नियमावलीत कलम ३७(१ क क) अन्वये करावयाच्या फेरबदलाबाबतची सूचना.....**

**महाराष्ट्र शासन,**
**नगर विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२**
**क्रमांक: टिपीबी-४३०९/१७८५/प्र.क्र.१३८/२००९/नवि-११**
**दिनांक: १५सप्टेंबर,२०१०**

**शासन निर्णय:-** सोबतची सूचना शासन साधारण राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( राजेंद्र हावडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व महानगरपालिका आयुक्त.
संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व विभागीय उपसंचालक, नगर रचना.
(यांना विनंती करण्यात येते की, शासन परिपत्रक क्र. टिपीएस संकीर्ण २००८/९६१/प्र.क्र.२५५/०८/ नवि-१२, दि. १३/९/२०१० नुसार सदर सूचनेची जहिरात विभागीय स्तरावर प्रसिध्द करणेची कार्यवाही करावी व त्यासंबंधीचे देयके संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवावीत.)
उप सचिव, नगर रचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नीरोड, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद.
(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची सूचना महाराष्ट्र शासन साधारण राजपत्रात भाग-१ मध्ये प्रसिध्द करण्यात येवून त्याच्या प्रत्येकी १० प्रती नगर विकास विभाग, (नवि-११), मंत्रालय, मुंबई-३२ व संबंधीत विभागीय उप संचालक, नगर रचना यांना पाठविण्यात याव्यात.)
कक्ष अधिकारी (संगणक कक्ष ) (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रदर्शित करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी)
अवर सचिव (नवि-१३, नवि-३०), कक्ष अधिकारी (नवि-९, नवि-१२)
निवडनस्ती (नवि-११).

**महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६**

राज्यातील सर्व महानगरपालिकाच्या विकास नियंत्रण नियमावलीत कलम ३७(१कक) अन्वये करावयाच्या फेरबदल बाबतची सूचना

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय,मुंबई -४०० ०३२**
**दिनांक :- १५ /९ /२०१०**
**क्रमांक-टिपीबी-४३०९/१७८५/प्र.क्र.१३८/२००९/नवि-११**

**सूचना**

ज्याअर्थी,शासन,सामाजीक न्याय विभागाने पत्र क्र. संकीर्ण २००६/प्र.क्र.२४५/विघयो-२,दि. २२/५/२००६ अन्वये मागासवर्गीय, अपंग बेरोजगारांना तसेच अर्थिकदृष्टया दूर्बल इ. व्यक्तींसाठी स्वंयरोजगार करण्याकरीता जागा उपलब्ध करुन देणेबाबतचे आदेश निर्गमित केलेले आहेत. या विषयाबाबत वेळोवेळी वृत्तपत्रांतही या संवर्गातील व्यक्तींच्या बेरोजगारीच्या समस्येबाबतच्या बातम्या प्रसिध्द होत असल्याचे प्रकर्षाने दिसून येते. तसेच मा.लोकआयुक्तांकडेही वेळोवेळी तक्रारी प्राप्त होत असतात.

ज्याअर्थी,स्वंयरोजगाराकरीता जागा उपलब्ध होण्यामध्ये मुख्य अडचण ही आहे की, सध्याच्या नागरी विकास संकल्पनेत नियमित व्यवसायीक जागा ( formal Commercial use) ची संकल्पना मान्य असून त्याकरीता विविध स्तरावर धोरणात्मक प्रोत्साहन देण्यात येत आहे. उदा. गृहनिर्माण सहकारी संस्थेत १५ टक्के व्यावसायीक वापरास परवानगी, अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक इत्यादी. परंतू ज्यांच्याकडे आर्थिक कुवत आहे तेच सदर व्यवसायिक जागा विकत घेऊ शकतात. सदरच्या जागा गरजू व्यक्तीच्या आर्थिक कुवतीच्या बाहेर असल्याने या व्यवसायिक वापरांचा वंचित वर्गातील गरजू व्यक्तींना उपयोग होत नाही. स्वंयरोजगाराकरीता अर्थिक मदत व प्रशिक्षणासोबत जागेचीही गरज असते. आर्थिक मदत व प्रशिक्षण याकरीता बरेच कार्यक्रम आहेत व त्यासाठी विविध मार्गही उपलब्ध आहेत. स्वंयरोजगाराकरीता सर्वात महत्वाची अडचण ही जागेची आहे. मुंबई व इतर मोठया शहरांत हा प्रश्न अत्यंत जटिल असून सतत वाढत असणारे जमिनीचे दर विचारांत घेता दिवसेंदिवस जागा मिळणे कठिण होत आहे. व त्याची फलश्रुती ही विविध ठिकाणी शासकीय जागेवर अतिक्रमणांच्या स्वरुपात होत असते.

ज्याअर्थी राष्ट्रीय व राज्य शासनाच्या पातळीवर अल्प उत्पन्न गटातील व्यक्तींकरिता सर्वसामान्यासाठी "परवडणा-या घरांकरिता " (Affordable housing) च्या संकल्पनेस मान्यता मिळाली आहे. राज्य शासनाकडूनही याकरीता उपक्रम राबविण्यात येत आहे.

तसेच झोपडपट्टीत राहणा-या व्यक्तींकरीता "झोपडपट्टी पुर्नवसन योजना" राबविण्यात येत आहे. अशा परवडणा-या घराच्या संकल्पनेस पुरक म्हणून सर्वसामान्यांना परवडेल अशा स्वरुपात स्वंयरोजगाराकरिता जागा ( Affordable Work Spaces) ही संकल्पना विकसित करुन त्याची अंमलबजावणी करण्याची गरज आहे.

ज्याअर्थी, मंत्री परिषदेने प्रोजेक्ट युनाईड अंतर्गत मुद्दा क्रमांक १७ (ड) मध्ये स्वंयरोजगाराकरिता जागा उपलब्ध करणे व मुद्दा क्र. २५ (२) (३) मध्ये Informal Work Places ची तरतूद करणे व कमी उत्पन्न वर्गाकरीता घराच्यासोबत काम करावयाच्या ठिकाणाचे एकत्र नियोजन करण्यात येईल जेणेकरुन त्यांना उत्पन्नाचे साधन मिळू शकेल याबाबतीत व मुद्दा क्र.२६(३)(ब) मध्ये गलिच्छ वस्ती सुधारणा करताना कामाच्या ठिकाणाचाही समावेश करण्याबाबत तरतूदीचा समावेश केलेला आहे. मंत्री परिषदेने दिनांक २५/७/२००३ रोजी त्यास मान्यता दिली आहे.प्रोजेक्ट युनाईटबाबतीत मंत्री मंडळाने मान्यता दिल्यानुसार त्यांची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

ज्याअर्थी, महाराष्ट्र लोकआयुक्त आणि उपलोकआयुक्त अधिनियम,१९७१ चे कलम १२(१) मधील तरतुदीनुसार मा.उपलोकआयुक्त यांनी बेरोजगारांना स्वंयरोजगारासाठी जागा उपलब्ध करण्याकरीता सर्वसामान्याना परवडेल ( Affordable Work Spaces) ची संकल्पना विकसित करुन अंमलबजावणी करावी अशी शिफारस केलेली आहे.

ज्याअर्थी, वरील शिफारशीच्या अनुषंगाने शासनाने राज्यातील सर्व महानगरपालिकांच्या विकास नियंत्रण नियमावलीत आवश्यक त्याठिकाणी फेरबदल महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियमाच्या (यापुढे "उक्त अधिनियम" असा उल्लेख करणेत आला आहे.) कलम ३७ (१क क) तरतुदीनुसार करणेचा निर्णय घेतलेला आहे.

त्याअर्थी,शासन याद्वारे खालील विकास नियंत्रण नियमावलीत करावयाचे फेरबदल प्रस्तावासंदर्भात उक्त अधिनियमाचे कलम ३७(१क क) अन्वये नागरीकाकडून सूचना/हरकती मागविण्याची नोटीस प्रसिध्द करीत आहे. या फेरबदला संदर्भात नागरीकांच्या काही सूचना/हरकती असल्यास त्या त्यांनी ही नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झालेल्या दिनांकापासून एक महिन्याचे आत सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मधील संबंधीत उपसंचालक ,नगर रचना यांच्याकडे लेखी स्वरुपात पाठवाव्यात. उपसंचालक, नगर रचना यांची उक्त अधिनियमाच्या कलम १६२ अन्वये अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत असून त्यांनी आवश्यक ती कार्यवाही करुन त्यांचा अहवाल शासनास विहीत मुदतीनंतर ३० दिवसात सादर करावा.

## प्रस्तावीत फेरबदल

१) २.० हेक्टरपेक्षा जास्त क्षेत्राच्या रेखाकंनात ५% सुविधा क्षेत्र ठेवणे अनिवार्य करुन त्यामध्ये त्यापैकी १०% क्षेत्र " परवडण्याजोगी रोजगार सुविधासाठी"( Affordable Work Spaces) राखून ठेवावी.

२) महानगरपालिकांच्या शॉपींग सेंटर /मार्केट इत्यांदीचा विकास / पुनर्विकास करताना, त्यामधील १०% क्षेत्र हे Affordable Work Spaces साठी राखून ठेवावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(राजेंद्र हाबडे )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

## परिशिष्ट -अ

| अ.क्र. | महसूल विभागाचे नांव | महानगरपालिकेचे नाव | उपसंचालक, नगर रचना यांचे कार्यालयाचे पत्ते |
|---|---|---|---|
| १ | बृहन्मुंबई विभाग | बृहन्मुंबई महानगरपालिका. | उप संचालक, नगर रचना, (बृहन्मुंबई ) इन्सा हटमेंट, आझाद मैदान, ई ब्लॉक, महापालिका मार्ग, मुंबई-४००००१ |
| २ | कोकण विभाग | १) नवी मुंबई महानगरपालिका.<br>२) ठाणे महानगरपालिका.<br>३) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका<br>४)उल्हासनगर महानगरपालिका.<br>५) भिवंडी-निझामपुर महानगरपालिका.<br>६) मिरा-भाईदर महानगरपालिका.<br>७) वसई-विरार महानगरपालिका. | उप संचालक, नगर रचना, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई, ३ रा मजला, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४. |
| ३ | पुणे विभाग | १) पुणे महानगरपालिका.<br>२) पिंपरी -चिंचवड महानगरपालिका<br>३) सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिका.<br>४) कोल्हापूर महानगरपालिका.<br>५) सोलापूर महानगरपालिका. | उप संचालक, नगर रचना, पुणे विभाग सर्व्हे नं. ७४/२, सहकार नगर, महाराष्ट्र बँकेच्यावर, पुणे- ४११००९ |
| ४ | नाशिक विभाग | १) नाशिक महानगरपालिका<br>२) मालेगांव महानगरपालिका.<br>३) जळगांव महानगरपालिका.<br>४) अहमदनगर महानगरपालिका.<br>५) धुळे महानगरपालिका. | उप संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नविन प्रशासकीय इमारत, आयुक्तालय आवार, नाशिक रोड- ४२२१०१ |
| ५ | औरंगाबाद विभाग | १) औरंगाबाद महानगरपालिका.<br>२) नांदेड-वाघाळा महानगरपालिका. | उप संचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, गृहनिर्माण भवन, २ रा मजला, प्रिन्टॅव्हेल हॉटेल जवळ, स्टेशन रोड, औरंगाबाद-४३१००१ |
| ६ | नागपूर विभाग | नागपूर महानगरपालिका | उपसंचालक, नगर रचना, नागपूर विभाग, जुने सचिवालय इमारत, रुम नं. १०८/१०९, पहिला मजला, सिव्हील लाईन्स, नागपूर- ४४०००१. |
| ७ | अमरावती विभाग | १)अमरावती महानगरपालिका.<br>२)अकोला महानगपालिका. | उप संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, "नीलगीरी" डॉ. अग्रवाल यांची इमारत, काग्रेसनगर रोड, अमरावती. |